वित्तीय मान्यता ( २०१७-१८)
**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) परंपरागत कृषि विकास योजना (PKVY) (सेंद्रिय शेती) सन २०१६-१७ चा अखर्चित निधी सन २०१७-१८ मध्ये वितरीत करण्याबाबत. ( सर्वसाधारण प्रवर्ग )**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सेंशेयो १२१६/ प्र.क्र.१४५ / १७ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख : ०७ ऑगस्ट, २०१७

वाचा : १) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना.
२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.सेंशयो १२१६/प्र.क्र. १४५/१७ अे, दि. २५.०७.२०१६
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.९-३५/२०१५/Org.Fmg ( i), दि.०९ मार्च, २०१७ चे दोन पत्रे
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र. ७५/ अर्थ - ३, दि. १८ एप्रिल,२०१७
५) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg, दि. ०८ जून, २०१७ चे पत्र.
६) कृषी आयुक्तालयाचे क्र. मृसमृचा/प्रक्र ४/परंप(सेंशे)/४३४/२०१७,दि. १३.०६.२०१७ चे पत्र.
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०१६ /प्र.क्र. ८९ / अर्थ - ३, दि. २० एप्रिल, २०१६

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत “परंपरागत कृषि विकास योजना (PKVY) (सेंद्रिय शेती ) ” ही नवीन योजना २०१५-१६ पासून राबविण्याचा निर्णय घेतला असून सदर योजना केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ०३ येथील पत्रान्वये सन २०१६-१७ करिता केंद्र हिश्श्यापैकी पहिल्या हप्त्यापोटी रक्कम रु. २६०२.६८ लाख सर्वसाधारण प्रवर्गाकरिता तर अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता रू.३५४.९१ लाख इतकी रक्कम वितरीत केली होती. परंतू सदरहू निधी आर्थिक वर्षाच्या अंतिम टप्प्यात प्राप्त झाल्याने वितरीत करता आला नाही. त्यामुळे अखर्चित राहिला. केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र. ५ येथील पत्रान्वये सदरहू निधी एकूण रू. २९५७.५९ लाख ( सर्वसाधारण प्रवर्ग रू. २६०२.६८ लाख तर अनुसुचित जाती प्रवर्ग रू. ३५४.९१ लाख ) सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास मंजूरी दिलेली आहे. त्यानुषंगाने सर्वसाधारण प्रवर्गाकरिता असलेला निधी रू. २६०२.६८ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रू. १७३५.१२ लाख असा एकूण रू. ४३३७.८० लाख निधी सन २०१७-१८ मध्ये वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत “परंपरागत कृषी विकास योजना (सेंद्रिय शेती ) ” या योजनेकरिता सन २०१६-१७ मधील अखर्चित राहिलेला सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी केंद्र हिस्सा रु.२६०२.६८ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु. १७३५.१२ लाख अशी एकुण रु. ४३३७.८० लाख ( त्रेचाळीस कोटी सदतीस लाख ऐंशी हजार फक्त ) रक्कम सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा ( ६० % ) | राज्य हिस्सा ( ४० % ) |
|---|---|---|
| सर्वसाधारण | रू. २६०२.६८ लाख | रू. १७३५.१२ लाख |
| **एकूण वितरीत करावयाचा निधी ( केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा)** | | रू. ४३३७.८० लाख |

२. सदर निधी खालील बाबींवर खर्च करण्यात यावा.

**अ ) पहिल्या वर्षामधील शिल्लक असलेल्या बाबींसाठी**

| अ.क्र. | घटक /बाब | गट संख्या | दर प्रति युनिट | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| क) | **एकात्मिक सेंद्रिय खत व्यवस्थापन** | | | | | |
| १ | गांडूळ खत उत्पादन युनिट (७x३x१ ) ५०००/- प्रति युनिट | ९३२ | १७५००० | ८८७.२५ | ५९१.५० | १४७८.७५ |
| | बायोडायनामिक सीपीसी युनिट उभारणी ( एका प्रकल्पात ५० सीपीपी युनिट ) | ९३२ | २५००० | १२५.७० | ८३.८० | २०९.५० |
| | एकूण | | | १०१२.९५ | ६७५.३० | १६८८.२५ |
| ख ) | भाडे तत्वावर औजारे घेण्या करिता अर्थसहाय्य | ९३२ | १५००० | ८३.८८ | ५५.९२ | १३९.८० |
| | एकूण | | | ८३.८८ | ५५.९२ | १३९.८० |
| | एकूण ( क + ख ) | | | १०९६.८३ | ७३१.२२ | १८२८.०५ |

## ब) द्वितीय वर्षातील बाबींसाठी

| अ.क्र. | घटक /बाब | गट संख्या | दर प्रति युनिट | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| क) | **पीजीएस प्रमाणीकरण व गुणवत्ता नियंत्रण** | | | | | |
| १ | तीन दिवसाचे तज्ञांचे/गट नेत्याचे (प्रवर्तक ) प्रशिक्षण रू.२५०/प्रति तज्ञ/प्रवर्तक प्रति दिन | ९३२ | ७५० | ४.१९ | २.८० | ६.९९ |
| २ | शेतक-यांची आनलाईन नोंदणी ५० शेतकरी/गट व रू.१००/प्रति शेतकरी | ९३२ | ५००० | २७.९६ | १८.६४ | ४६.६० |
| ३ | माती नमुने तपासणी २१ नमुने/वर्ष प्रति गट ( १९०/-रू.प्रति नमुना ) | ९३२ | ३९९० | २२.३१ | १४.८८ | ३७.१९ |
| ४ | सेंद्रिय प्रमाणिकरणाकरिता सेंद्रिय निविष्ठा वापर करणे, पीक पध्दतीत बदल करणे इ.बाबत अभिलेख जतन करणे रू.१००/-प्रति शेतकरी | ९३२ | ५००० | २७.९६ | १८.६४ | ४६.६० |
| ५ | सेंद्रिय शेतीची तपासणी - ४०० रू.प्रति तपासणी ( ३ तपासणी प्रति वर्ष ) | ९३२ | १२०० | ६.७१ | ४.४७ | ११.१८ |
| ६ | राष्ट्रीय मानांकित जैव-प्रयोगशाळेमधून ( एनएबीएल ) सेंद्रिय नमुन्यातील रासायनिक /विषमुक्त अंश- घटक तपासणी - ( ८ नमुने प्रति गट प्रति वर्ष ) रू.१००००/प्रति नमुना | ९३२ | ८०००० | ४४७.३६ | २९८.२४ | ७४५.६० |
| ७ | प्रमाणीकरण शुल्क | ९३२ | २००० | ११.१८ | ७.४६ | १८.६४ |
| ८ | सेंद्रिय प्रमाणीकरणाकरिता प्रशासकीय खर्च | ९३२ | १६९०० (व्दितीय वर्ष ) | ९४.५१ | ६३.०० | १५७.५१ |
| | एकूण | | | ६४२.१८ | ४२८.१३ | १०७०.३१ |
| ख ) | **सेंद्रिय ग्राम संकल्पना** | | | | | |
| १ | सेंद्रिय शेतीमध्ये परिवर्तन रू. १०००/-प्रति एकर ( क्षेत्र मर्यादा) ५० एकर प्रति गट | ९३२ | ५०००० | २७९.६० | १८६.४० | ४६६.०० |
| २ | नैसर्गिकरित्या उत्पादित जैविक नत्राचा वापर रू.२०००/प्रति एकर व ५० एकर प्रति गट प्रमाणे | ९३२ | ५०००० | ८६.२५ | ५७.५० | १४३.७५ |
| | एकूण | | | ३६५.८५ | २४३.९० | ६०९.७५ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ग ) | **एकात्मिक सेंद्रिय खत व्यवस्थापन** | | | | | |
| १ | द्रवरूप / सेंद्रिय जैविक किटकनाशकाचा संघटित/पुरेसा वापर करणे ५०० रु. प्रति एकर | ९३२ | २५००० | १३९.८० | ९३.२० | २३३.०० |
| २ | निम केक /निम आईल ५०० रू. प्रति एकर | ९३२ | २५००० | १३९.८० | ९३.२० | २३३.०० |
| | एकूण | | | २७९.६० | १८६.४० | ४६६.०० |
| घ) | **पॅकींग, लेबलिंग,सेंद्रिय मालाचा गटाचा ब्रँड विकसित करणे** | | | | | |
| १ | सेंद्रिय शेती उत्पादन महोत्सव /विक्री मेळावा | ९३२ | ३६३३० | २०३.१६ | १३५.४४ | ३३८.६० |
| | एकूण | | | २०३.१६ | १३५.४४ | ३३८.६० |
| | एकूण ( क+ख+ग + घ ) | | | १४९०.७९ | ९९३.८७ | २४८४.६६ |
| | आकस्मिक खर्च ( १ टक्का ) | | | १५.०६ | १०.०३ | २५.०९ |
| | एकूण एकंदर | | | १५०५.८५ | १००३.९१ | २५०९.७५ |
| **अंतिम एकूण (अ + ब) ( पहिल्या वर्षामधील शिल्लक बाबी + द्वितीय वर्षातील बाबी )** | | | | **२६०२.६८** | **१७३५.१२** | **४३३७.८०** |

**२.** या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी - ३**, २४०१ पीक संवर्धन, १०५ खते व रासायनिक खते, (००) (३५ ) कृषी उन्नती योजना-परंपरागत कृषी विकास योजना ( केंपुयो ) ( ६० % केंद्र हिस्सा ) ( २४०१ अे०५६ ) ( योजनांतर्गत) ३३-अर्थसहाय्य

**मागणी क्र. डी -** ३, २४०१ पीक संवर्धन, १०५ खते व रासायनिक खते, ( ०० ) ( ३६) कृषी उन्नती योजना-परंपरागत कृषी विकास योजना ( केंपुयो ) ( ४० % राज्य हिस्सा ) ( २४०१ अे०६५ ) (योजनांतर्गत ) ३३ - अर्थसहाय्य

**३. सदर योजना प्रत्यक्ष राबविणा-या यंत्रणेने खालील अटी व शर्तीचे पालन करावे.**

१) सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाने निधी वितरीत केलेल्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार विनियोग होईल याची दक्षता घ्यावी.

२) विविध घटकासाठी वित्तीय सहाय्य हे योजनेच्या मार्गदर्शक सूचनानुसार व केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० प्रमाणे असावेत.

३) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा.त्याप्रमाणे अनुसूचित जाती / जमाती / महिला लाभार्थ्यासाठी खर्चाचे लेखे वरील

प्रमाणे ठेवण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेची राहील.

४) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा. तसेच सदरचा अहवाल राज्य शासनाकडेसुध्दा पाठविण्यात यावा.

५) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

६) या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने आयुक्त ( कृषी ) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रधान सचिव ( कृषी ) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

**४.** कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन काम पाहतील. सहाय्यक संचालक लेखा -१ कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत शासकीय कोषागारातून निधी काढून क्षेत्रिय अधिका-यांनी शासनाच्या वित्त विभागाच्या सहमती शिवाय उघडलेल्या बँक खात्यावर ठेवू नये.

**५.** प्रस्तुतचे आदेश नियोजन विभागाने अ.नौ.सं.क्र. २५/१४३१ दि. ३०.०६.२०१७ व वित्त विभागाने अ.नौ.सं.क्र.दि.११९/२०१७/व्यय १, दिनांक २१.०७.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून व प्रधान सचिव ( कृषी ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०७१८२९४४८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26a a74e1d37e67433a0ce27e6a2caf774b979 5c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2017.08.07 18:20:40 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) / मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२) प्रधान सचिव (कृषी ) यांचे स्वीय सहाय्यक ,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त (कृषी ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य ,पुणे
५) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
६) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
७) सहायक संचालक (लेखा - १ )कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१२) नियोजन विभाग-१४३१
१३) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवडनस्ती.